**एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम-३**
वित्तिय वर्ष २०१६-१७- वनामती, नागपूर
यांना अनुदान वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
शासन निर्णय क्रमांक : टिआरएन-०४१६/प्र.क्र.४६/१६/सीपीटीपी-ब
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : २९ नोव्हेंबर, २०१६.

वाचा : १) सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्रमांक : बीयुडी-२०१६/प्र.क्र.५२/२०१६/२५, दि. ६ एप्रिल, २०१६.
२) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय टिआरएन ४१६/प्र.क्र.४६/१६/सीपीटीपी-ब, दिनांक १२ एप्रिल, २०१६.
३) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दिनांक २०.०४.२०१६
४) सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र. बीयुडी-२०१६/प्र.क्र. ५२/२०१६/२५, दिनांक २२ एप्रिल, २०१६
५) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय टिआरएन ४१६/प्र.क्र.४६/१६/सीपीटीपी-ब, दिनांक ६ जून, २०१६.

शासन निर्णय :-

शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग, दिनांक २० जानेवारी,२०१४ नुसार शासन सेवेमध्ये सरळसेवेने नियुक्त होणाऱ्या गट अ व ब मधील विविध संवर्गातील अधिकाऱ्यांसाठी एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम राबविण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे. या प्रशिक्षण कार्यक्रमासाठी वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, नागपूर या संस्थेला सन २०१६-१७ या आर्थिक वर्षाच्या खर्चासाठी वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक १ येथील शासन परिपत्रकान्वये अर्थसंकल्पीय अंदाजामध्ये **रु. २४६५.०० लाख (रुपये दोन हजार चारशे पासष्ट लाख फक्त)** इतकी तरतूद करण्यात आलेली आहे. त्यापैकी (२०७००८६२) ३१, सहायक अनुदान (वेतनेतर )अंतर्गत रु. ४,०३,३३,०००/-व (२०७००८६२) ३६, सहायक अनुदान (वेतन) अंतर्गत रु. ७,५०,०००/- अशा प्रकारे एकुण रु. ४,१०,८३,०००/- इतके अनुदान (अक्षरी रुपये चार कोटी दहा लक्ष त्र्याऐंशी हजार फक्त) इतके अनुदान संदर्भाधिन अनुक्रमांक २ येथील शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आले आहे.

२. वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक ३ येथील परिपत्रकातील सूचनांनुसार सन २०१६-१७ च्या प्रथम नऊमाहीकरीता (डिसेंबर, २०१६ अखेर) आवश्यक असणारा योजनेतर अर्थसंकल्पीत निधी एकुण वार्षिक तरतुदीच्या ८०% मर्यादेत वितरित करण्यासाठी संदर्भ क्र.४ येथील परिपत्रकान्वये नियंत्रक अधिकाऱ्यांच्या स्वाधीन करण्यात आला आहे. त्याचप्रमाणे संदर्भ क्रमांक ५ येथील शासन निर्णयान्वये अनुदानाचा दुसरा टप्पा म्हणून ३१, सहायक अनुदानपोटी (वेतनेतर)रु. १,९२,५०,०००/- व ३६, सहायक अनुदानापोटी (वेतन) रु. ३,७५,०००/- असे एकुण रु.१,९६,२५,०००/-(अक्षरी रुपये एक कोटी शहाण्णव लाख पंचवीस हजार फक्त ) इतके अनुदान वितरीत करण्यात आले आहे.

३. आता वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, नागपूर या संस्थेच्या मागणीनुसार एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यकमासाठी उपलब्ध निधीतून खालीलप्रमाणे (२०७००८६२) ३१, सहायक अनुदान (वेतनेतर) अंतर्गत रु. ३४,०३,०००/-(अक्षरी रुपये चौतीस लक्ष तीन हजार फक्त) व (२०७००८६२) ३६, सहायक अनुदान (वेतन) अंतर्गत रु. ३,०५,०००/- (अक्षरी रुपये तीन लक्ष पाच हजार फक्त) अशा प्रकारे एकुण रु. ३७,०८,०००/-(अक्षरी रुपये सदतीस लक्ष आठ हजार फक्त) इतके अनुदान पुढीलप्रमाणे वितरीत करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे -

| अ.क्र. | प्रशिक्षण संस्थेचे नाव | उपशीर्ष | अर्थसंकल्पीत वितरण प्रणालीतून वितरीत करावयाची तरतूद (रु.) |
|---|---|---|---|
| १. | वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, नागपूर | (००)(११) वनामती, नागपूर या संस्थेस एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमासाठी सहायक अनुदान (२०७०००८६२) ३१, सहायक अनुदान - (वेतनेतर) | रुपये ३४,०३,०००/- |
| | | ३६. सहायक अनुदान (वेतन) | रुपये ३,०५,०००/- |
| | | **एकुण वितरीत करावयाचे अनुदान** | **रुपये ३७,०८,०००/-** |

४. वनामती, नागपूर या संस्थेने आर्थिक वर्ष २०१६-१७ मधील आपला खर्च वितरीत अनुदानाच्या मर्यादेत ठेवावा.

५. सन २०१६-१७ या आर्थिक वर्षात केलेल्या खर्चाचा खर्च ताळमेळ करण्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित नियंत्रक अधिकारी तसेच आहरण व संवितरण अधिकारी यांची राहील.

६. वनामती, नागपूर या संस्थेने वितरीत करण्यात येत असलेल्या अनुदानाचे विनियोग प्रमाणपत्र (UTILIZATION CERTIFICATE) महालेखापाल, लेखा परीक्षा, महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर व शासनाला सादर करावे.

७. वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, नागपूर या संस्थेने उपरोक्त अनुदानामधून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके ठेवण्यात यावे व सदर लेखे व पुस्तके तपासण्याचे अधिकार महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर यांना राहतील.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१६११३०११३४२२८८०७ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने सांक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ajit Sopanrao Deshmukh

Digitally signed by Ajit Sopanrao Deshmukh
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Ajit Sopanrao Deshmukh
Date: 2016.11.30 11:39:36 +05'30'

**(अजित देशमुख)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. महालेखापाल,(लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१,मुंबई,
२. महालेखापाल,(लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२,नागपूर,
३. प्र.स.(सेवा) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
४. संचालक, वनामती, नागपूर,
५. वरिष्ठ प्रशासनिक व लेखाधिकारी, वनामती, नागपूर (२ जादा प्रतींसह),
६. सहसंचालक, लेखा व कोषागारे, (संगणक शाखा), मुंबई,
७. जिल्हा कोषागार कार्यालय, नागपूर
८. उप कोषागार कार्यालय, नागपूर
९. वित्त विभाग (व्यय-४/ अर्थसंकल्प १४), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१०. अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग/कार्यासन क्र. २५, मुंबई-३२.
११. निवड नस्ती.